**मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतुदीनुसार एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी जमा रक्कमेमधून मुंबई मेट्रो रेल्वे या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांच्या अंमलबजावणी संस्थांना निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२३/प्र.क्र.९० (भाग-२)/नवि-७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- १५ मार्च, २०२४.**

**वाचा :**

१. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. ५६ दि. २१.०८.२०१५.
२. महाराष्ट्र शासन राजपत्र भाग एक-अ नागपूर विभागीय पुरवणी अधिसूचना दि.३०.०६.२०१६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७, दिनांक १० सप्टेंबर, २०२०.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२२/प्र.क्र.१७३/नवि-७, दि.०८.१२.२०२३, २०.०२.२०२३, दि.२८.०३.२०२३, दि. २८.०७.२०२३.
५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२३/प्र.क्र.९०/नवि-७, दि. १८.०९.२०२३.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०, अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३.
७. शासन समक्रमांक शासन निर्णय दि.१८ सप्टेंबर, २०२३, २३ ऑक्टोबर, २०२३ व १ नोव्हेंबर, २०२३

**प्रस्तावना :-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतुदीनुसार राज्यामध्ये राबविण्यात येत असलेल्या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांशी संबंधित महानगरपालिका क्षेत्रात स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, दान व फलोपभोग गहाण या संबंधीच्या संलेखांवर मुद्रांक शुल्क अधिनियमान्वये आकारावयाच्या मुद्रांक शुल्कात एक टक्का दराने अधिभार आकारुन वाढ करणे व सदर अधिभारापोटी वसुल केलेल्या रक्कमेएवढे सहायक अनुदान अशा प्रकाराचे प्रकल्प हाती घेतलेल्या अभिकरणाला/प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला प्रदान करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे.

एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी वसूल करण्यात आलेल्या रक्कमेमधून मुंबई, पुणे मेट्रो या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांना सन २०२३-२४ मध्ये मंजूर तरतुदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी सन २०२३-२४ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधूनन खालील **विवरणपत्र-अ** दर्शविल्याप्रमाणे **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई (एमएमआरडीए) , मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन (एमएमआरसीएल)** महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन (महामेट्रो) **ला एकूण रु.१२२९.५४ कोटी** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

विवरणपत्र अ

सन २०२३-२४ मध्ये वितरीत करावयाचे अनुदान

| अ.क्र. | लेखाशीर्षाचा तपशील | वितरीत करावयाचा निधी (रुपये कोटी मध्ये) | निधी वितरीत करावयाच्या संस्थेचे नाव |
|---|---|---|---|
| मागणी क्रमांक एफ-५, ४२१७-नगर विकासावरील भांडवली खर्च, ६०- नगर विकास विभाग इतर योजना, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका | | | |
| १. | मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८०१) | **८३७.१२** | **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई** |
| | | **१७९.८८** | **मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई** |
| २. | पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८२८) | **२१२.४७** | **महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन (महामेट्रो), नागपूर** |
| ३. | नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्प मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान सांकेतांक क्र. (४२१७०८१९) | **०.०७** | **महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन (महामेट्रो), नागपूर** |
| | **एकूण** | **१२२९.५४** | |

२. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव, नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम उपरोक्त विवरणपत्रात नमूद केलेल्या संस्थांना वितरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोखशाखेने देयक तयार करून ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे पाठवावे. सदर निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरूपाचे आहे.

३. सदर अनुदानाची रक्कम नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७ दि. १० सप्टेंबर, २०२० अन्वये निश्चित केलेल्या धोरणाप्रमाणे मेट्रो रेल्वे प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेच्या “समर्पित नागरी परिवहन निधी” खात्यामध्ये जमा झाल्याबाबत प्रमाणपत्र सादर करण्यात यावे. तसेच सदर जमा रक्कमेतून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या सदर रक्कमांसाठी **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई व महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, नागपूर** यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावे.

५. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर निधीसाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अनुदान विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

२. मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई व महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, नागपूर यांना वितरीत करण्यात करण्यात येणारी रक्कम ही केवळ प्रकल्पासाठी बाह्य सहाय्यित संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी वापरावयाची आहे. बाह्य सहाय्यित संस्थेला कर्जाची परतफेड केल्याचा तपशील व सदर जमा रक्कमेतून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७ दि. १० सप्टेंबर, २०२० अन्वये निश्चित केलेल्या धोरणाच्या अनुषंगाने शासन यथास्थिती निर्देशित करेल अशा अटी व शर्ती देखील संबंधित मेट्रो प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणांना बंधनकारक राहतील.

४. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि. १२ एप्रिल, २०२३ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाचा अनौ. संदर्भ ६२/व्यय-३, दि. १३/०३/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५२१४७५६७१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 21:57:41 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, नागपूर
८. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. सह सचिव, (अर्थसंकल्प-१६), (व्यय-३), (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सह सचिव, न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. लेखाधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. रोख शाखा (३ प्रती)
१८. निवड नस्ती, नवि-७.